**कृति आराखडाअंतर्गत २००९-२०१० मध्ये "खताचा समतोल व एकात्मिक वापर अंतर्गत गांडूळखताचे उत्पादन व वापर आणि सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य" ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संखाद १००९/प्र.क्र. १५१/१७-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :०९ मार्च, २०१०**

**वाचा :** **१) केंद्रिय कृषि मंत्रालयाचे पत्र क्रमांक ६-६/२००९, एमएम दि. ३० जून, २००९.**
**२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.संखाद १००९/प्र.क्र.१५१/१७अे, दि. २२/७/२००९**
**३)शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.संखाद १००९/प्र.क्र.१५१/१७अे, दि. ३१/७/२००९**
**४)शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.संखाद १००९/प्र.क्र.१५१/१७अे, दि. २७/११/२००९**
**५) केंद्रिय कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. ६-६/२००९, एमएम दि. १५ जनेवारी, २०१०**
**६) केंद्रिय कृषि मंत्रालयाचे पत्र क्र. ६-६/२००९, एमएम दि. २५ जनेवारी, २०१०.**

**प्रस्तावना-**

कृति आराखडयांतर्गत सन २००९-२०१० मध्ये "खताचा समतोल व एकात्मिक वापर अंतर्गत गांडूळखताचे उत्पादन व वापर आणि सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य" (केंद्र हिस्सा ७५ % व राज्य हिस्सा २५ %) या योजनेस केंद्र शासनाने दिनांक ३० जुन,२००९ च्या पत्रान्वये मान्यता दिलेली होती. त्यास अनुसरुन सदर योजना राज्यात राबविण्याकरीता संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २२ जुलै, २००९ अन्वये रू.२६०.४० एवढया कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. यापैकी संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७ नोव्हेंबर, २००९ अन्वये रुपये १५२.०० लाख इतका निधी वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्यात आली होती. केंद्र शासनाने आता सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य या योजनेमध्ये प्रवर्तकांचे प्रशिक्षण हा घटक राबविण्यास तसेच याकरीता रू.३२.०० लाखचा निधी वितरीत करण्यास संदर्भादीन पत्र दि. १५/१/२०१० अन्वये मान्यता दिली आहे. तसेच "खताचा समतोल व एकात्मिक वापर अंतर्गत गांडूळखताचे उत्पादन व वापर आणि सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य"या योजनेतील उर्वरीत निधी रू.१०८.४० लाख वितरीत करण्यास केंद्र शासनाने संदर्भादीन पत्र दि. २५/१/२०१० अन्वये मान्यता दिली आहे

**शासन निर्णय-**

कृति आराखडयांतर्गत २००९-२०१० अंतर्गत "खताचा समतोल व एकात्मिक वापर अंतर्गत सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य" या योजनेमध्ये प्रवर्तकांचे प्रशिक्षण हा घटक राबविण्यास तसेच याकरीता रू.३२.०० लाखचा निधी वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच "खताचा समतोल एकात्मिक वापर अंतर्गत गांडूळ खताचे उत्पादन व वापर आणि सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी अर्थसहाय्य" हा कार्यक्रम खर्चासह राज्यात राबविण्यासाठी दिलेली प्रशासकीय मान्यता लक्षात घेवून या योजनेतील उर्वरीत निधी केंद्र शासनाचा हिस्सा (७५ टक्के) रु.५२.५० लाख (रुपये बावन्न लाख पन्नास हजार फक्त) व राज्य शासनाचा हिस्सा (२५ टक्के) रु.१७.५० लाख (रुपये सतरा लाख पन्नास हजार फक्त) असे एकूण रुपये ७०.०० लाख (रूपये सत्तर लाख फक्त) आणि सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन या योजनेकरीता मंजूर निधीमध्ये केंद्र शासनाचा हिस्सा (७५ टक्के) म्हणजे रुपये ५२.८० लाख (रुपये बावन्न लाख ऐंशी हजार फक्त) व राज्य शासनाचा हिस्सा (२५ टक्के) म्हणजेच रुपये १७.६० लाख (रुपये सतरा लाख साठ हजार फक्त) असे एकूण रुपये ७०.४० लाख (रूपये सत्तर लाख चाळीस हजार फक्त) (यामध्ये प्रवर्तकांचे प्रशिक्षण हा घटक राबविण्यासाठी मंजूर केलेले रू.३२.०० लाखचा समावेश आहे) इतकी रक्कम वितरीत करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२.	सदरचा निधी सन २००९-२०१० या वर्षात खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**१)मागणी क्र.डी.-४**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०५, खते व रासायनिक खते**
**(००)(२५) गांडूळ खताचे उत्पादन व वापराची योजना**
**(केंद्र पुरस्कृत योजना)(२४०१४०२४)**
**३३ अर्थसहाय्य**

**२)मागणी क्र.डी.-४**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०५, खते व रासायनिक खते**
**(००)(२९) गांडूळ खताचे उत्पादन व वापराची योजना**
**(राज्य योजना)(२४०१४५२५)**
**३३ अर्थसहाय्य**

**३) मागणी क्र.डी.-४**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०५, खते व रासायनिक खते**
**(००)(३०) सेंद्रीय शेतीला चालना देणे**
**(केंद्र पुरस्कृत योजना)(२४०१४५३२४)**
**३३ अर्थसहाय्य**

**४) मागणी क्र.डी.-४**
**२४०१, पीक संवर्धन,**
**१०५, खते व रासायनिक खते**
**(००)(२७)सेंद्रीय शेतीला चालना देणे**
**(राज्य योजना)(२४०१४४०१)**
**३३ अर्थसहाय्य**

३	वरील निधी खर्च करण्यास संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे. तसेच मंजूर निधीचे संबंधित अधिका-यांना वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यांत येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार या योजनेंचा, आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल विहीत मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४.	सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३४ अे /१०/व्यय -१, दि.२४.२.२०१० अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात आलेला आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३१०१७१५१५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वा.म.तुरुकमाने)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
सर्वसंचालक/सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग
कार्यासन २ अे, कृषि व पदुम विभाग मंत्रालय मुंबई
निवड नस्ती.